विभागीय व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांच्या दैनंदिन कामकाजावर विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांच्या परिणामकारक सनियंत्रणाबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन परिपत्रक क्रमांक: टिआरएन २०२१/ प्र.क्र.१२५ / १२-अ**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक : १४ ऑक्टोबर, २०२१

<u>वाचा :</u>- १) शासन निर्णय सा.प्र.वि. क्र. टिआरएन ०९/प्र.क्र. ३९/०९/१२-अ, दि. २३.०९.२०११.
२) शासन निर्णय सा.प्र.वि. क्र. टिआरएन २०११/ प्र.क्र. २८७/११/१२-अ, दि.१४.१०.२०१३.
३) शासन निर्णय सा.प्र.वि. क्र. टिआरएन २०१४/प्र.क्र.१२०/१४/१२-अ, दि.१३.०८.२०१४.
४) शासन निर्णय सा.प्र.वि. क्र. टिआरएन २०१४/प्र.क.१२०/१२-अ, दि.१२.०९.२०१४.
५) शासन निर्णय सा.प्र.वि.क्र. टिआरएन २०१५/प्र.क्र.१२२/१५/१२-अ, दि.२८.१०.२०१५
६) शासन निर्णय सा.प्र.वि. क्र. टिआरएन २०१७/प्र.क्र. ५१/१७/१२-अ, दि. ०२.०८.२०१८

## परिपत्रक

राज्य शासन सेवेत सर्व स्तरावर कार्यक्षमता वाढवून गतिमान प्रशासन होण्याकरिता राज्यातील सर्व कर्मचारीवृंद यांना प्रशिक्षण देण्याच्या हेतूने संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये राज्याचे प्रशिक्षण धोरण निश्चित करण्यात आले आहे. त्यानूसार प्रशासनिक प्रशिक्षणाची प्रक्रिया राज्य, विभाग व जिल्हा अशा तीन स्तरांवर कार्यान्वित आहे. तसेच विभागीय आणि जिल्हा स्तरावर प्रशिक्षण विषयक कामकाज पार पाडण्यासाठी संदर्भाधीन क्र. २ ते ६ येथील शासन निर्णयान्वये विभागीय आणि जिल्हा प्रशिक्षण संस्था घोषित केल्या आहेत. सदरहू संस्थांची यादी (परिशिष्ट -अ आणि ब) सोबत जोडली आहे. तसेच सदर संस्थांना त्यांचे प्रशिक्षण विषयक कामकाजासंदर्भात मार्गदर्शन करण्यासाठी नियामक मंडळ आणि दैनंदिन कामाकाजावरील नियंत्रणासाठी कार्यकारी मंडळाची रचना विहित केली आहे.

२. **संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयानुसार विभागीय प्रशिक्षण संस्थांची पुढील उद्दिष्टे निश्चित केली आहेत.**

१. विभागीय मुख्यालयात असलेल्या वर्ग-ब व क च्या अधिकारी/कर्मचा-यांसाठी प्रशिक्षण कार्यक्रम घेणे.
२. विशेष योजना व कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी निवडलेल्या गटांकरिता विभागवार विशेष कार्यशाळा आयोजित करणे.
३. संबंधित विभागातील स्थानिक स्वराज्य संस्था व शासनाचे अंगीकृत व्यवसाय यांच्या प्रशिक्षण गरजा पूर्ण करण्यासाठी क्षेत्रीय संस्थांना प्रशिक्षण सुविधा उपलब्ध करुन देणे.
४. राज्य स्तरावर संशोधनासाठी माहिती सामुग्रीचे विकसन करणे, तसेच यशदा व राज्य शासनाशी संपर्क साधणे
५. प्रशिक्षणाचे वेळोवेळी मूल्यमापन करणे.
६. प्रायोजित प्रशिक्षण कार्यक्रम प्रकल्प व सल्ला सेवा यामधुन निधी उभारणे.
७. प्रशिक्षण धोरणाच्या अंमलबजावणीसंदर्भात आवश्यक कार्यवाही करणे.

**तसेच संदर्भाधीन क्र. ३ च्या शासन निर्णयानुसार जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांची पुढील उद्दिष्टे निश्चित केली आहेत.**

१. जिल्हयात असलेल्या वर्ग-ड च्या कर्मचा-यांसाठी जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण केंद्र सुरु करुन प्रशिक्षण कार्यक्रम घेणे.
२. जिल्हयातील विशेष योजना व कार्यक्रमांची अंमलबजावणी करण्यासाठी निवडलेल्या गटांकरिता विशेष कार्यशाळा आयोजित करणे

३. संबंधित जिल्हयातील स्थानिक स्वराज्य संस्था व शासनाचे अंगीकृत व्यवसाय यांच्या प्रशिक्षण गरजा पूर्ण करण्यासाठी क्षेत्रीय संस्थांना प्रशिक्षण सुविधा उपलब्ध करुन देणे.

४. प्रशिक्षणाचे वेळोवेळी मूल्यमापन करणे.

५. प्रशिक्षण धोरणाच्या अंमलबजावणीसंदर्भात आवश्यक कार्यवाही करणे.

विभागीय आणि जिल्हा प्रशिक्षण संस्थांच्या उपरोक्त नमुद उद्दिष्टांच्या परिणामकारक पूर्ततेसाठी विभागीय प्रशिक्षण संस्थांच्या 'कार्यकारी मंडळाचे 'आणि जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांच्या 'नियामक मंडळांचे' पदसिध्द अध्यक्ष हे संबंधित विभागीय आयुक्त आहेत. तसेच विभागीय प्रशिक्षण संस्थांच्या नियामक मंडळाचे ते पदसिध्द उपाध्यक्षही आहेत. तर संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी हे जिल्हा प्रशिक्षण संस्थांच्या कार्यकारी समितीचे पदसिध्द अध्यक्ष आहेत.

विभागीय आणि जिल्हा प्रशिक्षण संस्थांच्या नियामक मंडळ आणि कार्यकारी मंडळांच्या उपरोक्त रचनेनुसार संबंधित विभागीय आयुक्त आणि जिल्हाधिकारी यांचे सदरहू प्रशिक्षण संस्थांवर अधिक परिणामकारक संनियंत्रण असणे आवश्यक असल्याचे प्रशिक्षण विषयक आढावा बैठकांच्यावेळी निदर्शनास आले. यानुषंगाने राज्य प्रशिक्षण धोरणाच्या यथोचित अंमलबजावणीसाठी सर्व विभागीय आयुक्त आणि जिल्हाधिकारी यांना खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत. :-

१) संबंधित विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी यांनी संबंधित विभागीय /जिल्हा प्रशिक्षण संस्थांशी योग्य समन्वय राखून सनियंत्रणाचे कामकाज अधिक परिणामकारक होण्यासाठी विशेष दक्षता घ्यावी. सदर संस्थांना वेळोवेळी प्रत्यक्ष भेटी दयाव्यात.

२) याकरिता संबंधित विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी यांनी संबंधित विभागीय /जिल्हा प्रशिक्षण संस्थांमधील प्रशिक्षण विषयक सेवा सुविधा, मनुष्यबळ (रिक्त पदे), प्रशिक्षण विषयक दर्जा इत्यादी. बाबींचा वेळोवेळी आढावा घेऊन प्रशिक्षणाच्या उद्दिष्टपूर्तीसाठी संस्थेस उचित मार्गदर्शन करावे.

३) सदरहू संस्थांच्या नियामक मंडळ आणि कार्यकारी मंडळांच्या बैठकांचे वेळोवेळी आयोजन होण्याकरिता संबंधित संस्थांना वेळोवेळी आवश्यक निदेश दयावेत.

४) प्रशिक्षण संस्थांच्या प्रशिक्षणाचा दर्जा उंचावण्याच्या दृष्टीने सदरहू संस्थाच्या प्रशिक्षणा सत्रांमध्ये अतिथी व्याख्याते म्हणून प्रत्यक्ष सहभाग घ्यावा.

५) विभागातील/जिल्हयातील प्रलंबित प्रशिक्षणाचा वेळोवेळी आढावा घेऊन त्याबाबतचा अहवाल यशदा, पुणे या शिखर संस्थेस सादर करावा.

६) वेळोवेळी विहीत शासन निदेशानुसार प्रशिक्षणासाठी आवश्यक अर्थसंकल्पिय तरतूद आणि त्याचा यथायोग्य विनियोग याबाबत संस्थांवर आवश्यक सनियंत्रण राखावे.

सर्व विभागीय आयुक्त आणि जिल्हाधिकारी यांनी उपरोक्त सूचनांची नोंद घेऊन आवश्यक कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२११०१४१६३५१४०९०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gupte Sanju Kamlakar

Digitally signed by Gupte Sanju Kamlakar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2834863d93dd5ba34736e8845b6287c3dd58ee176cf2b893df4e169e70699c59, serialNumber=4c10e808fe85223e03be4cad0148cef9a71914878680c586fc438e7239dafca4, cn=Gupte Sanju Kamlakar
Date: 2021.10.14 16:36:25 +05'30'

**( सं. क. गुप्ते )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२
५. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
६. महासंचालक, यशदा, पुणे
७. सर्व विभागीय आयुक्त
८. सर्व जिल्हाधिकारी
९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१०. उपमहासंचालक, यशदा, पुणे
११. सर्व विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांचे संचालक/प्राचार्य
१२. सर्व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांचे संचालक/प्राचार्य
१३. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य -१, मुंबई
१४. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य -२, नागपूर
१५. महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र राज्य-१, मुंबई
१६. महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र राज्य-२, नागपूर
१७. अपर मुख्य सचिव, (सेवा) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१८. निवड नस्ती-१२-अ, सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई-३२.

## परिशिष्ट-अ

## राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत कार्यरत विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था -

| अ.क्र. | विभाग | संलग्न जिल्हे | विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था |
|---|---|---|---|
| १. | कोकण | रत्नागिरी, सिंधुदुर्ग, सातारा, सांगली , सोलापूर, कोल्हापूर | कुंडल विकास प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), कुंडल, ता. पलुस, जि. सांगली-<br>**वन विभाग** |
| २. | नाशिक | नाशिक, धुळे, नंदुरबार, अहमदनगर, जळगांव | नाशि महसूल प्रशिक्षण प्राबोधिनी, नाशिक-<br>**महसुल व वन विभाग** |
| ३. | पुणे | पालघर, ठाणे, मुंबई नगर, मुंबई उपनगर, रायगड, पुणे | प्रादेशिक कृषी विस्तार व्यवस्थापन संस्था, रामेती, चा-होली, पुणे-<br>**कृषी व पदुम विभाग** |
| ४. | औरंगाबाद | जालना, परभणी, औरंगाबाद, हिंगोली, बीड, नांदेड, उस्मानाबाद, लातूर | मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर, (उत्तर), पैठण,जि. औरंगाबाद-<br>**सामान्य प्रशासन विभाग** |
| ५. | अमरावती | यवतमाळ, अकोला, वाशिम, बुलढाणा, अमरावती | डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती-<br>**सामान्य प्रशासन विभाग** |
| ६ | नागपूर | नागपूर, वर्धा, चंद्रपूर, भंडारा, गोंदिया, गडचिरोली | वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन संस्था, वनामती, नागपूर-<br>**कृषी व पदुम विभाग** |

**परिशिष्ट- ब**

**राज्य प्रशिक्षण धोरणान्वये घोषित जिल्हा प्रशिक्षण संस्था -**

| अ.क्र. | जिल्हा | जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था |
|---|---|---|
| १. | सातारा | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था, जि. सातारा |
| २. | सोलापूर | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था, जि. सोलापूर |
| ३ | कोल्हापूर | प्रादेशिक कृषी विस्तार व्यवस्थापन संस्था (रामेती),गेट नं-४, शहाजी नगर, मध्यवर्ती इमारतीजवळ, लाईनबाजार, कोल्हापूर-०३ |
| ४. | रत्नागिरी | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था, जि. रत्नागिरी |
| ५. | सिंधुदुर्ग | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था, जि. सिंधुदुर्ग |
| ६. | धुळे | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था, जि. धुळे |
| ७. | नंदूरबार | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था, जि. नंदूरबार |
| ८ | अहमदनगर | अहमदनगर जिल्हा प्रशिक्षण प्रबोधिनी, जि. अहमदनगर |
| ९. | जळगांव | दादासाहेब चौधरी वनरक्षक प्रशिक्षण संस्था, पाल,जळगांव |
| १०. | पालघर | ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र कोसबाड हील, ता. डहाणू, जि. पालघर |
| ११. | ठाणे | वनरक्षक प्रशिक्षण विद्यालय, शहापूर, ठाणे |
| १२. | मुंबई उपनगर | न्युझीलंड हॉस्टेल, आरे कॉलनी, गोरेगाव (प), मुंबई उपनगर |
| १३. | रायगड | प्रादेशिक कृषी विस्तार व्यवस्थापन, प्रशिक्षण संस्था, रामेती, खोपोली |
| १४. | पुणे | ग्रामसेवक प्रशिक्षण संस्था, मांजरी फार्म, पुणे |
| १५. | जालना | वररक्षक प्रशिक्षण संस्था, देऊळगांव, राजा रोड, पी.बी. ९३, जालना-०३ |
| १६. | परभणी | ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, मराठवाडा ॲग्रीकल्चर विद्यापीठ, परभणी |
| १७. | औरंगाबाद | मराठवाडा  महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद |
| १८. | हिंगोली | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था,जि. हिंगोली |
| १९. | बीड | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था,जि. बीड |
| २०. | नांदेड | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था,जि. नांदेड |
| २१. | उस्मानाबाद | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था,जि. उस्मानाबाद |
| २२. | लातूर | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था,जि. लातूर |
| २३. | यवतमाळ | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था,जि. यवतमाळ |
| २४. | अकोला | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था,जि. अकोला |
| २५. | वाशिम | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था,जि. वाशिम |
| २६. | बुलढाणा | ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, जि. बुलढाणा |
| २७. | अमरावती | महाराष्ट्र लेखा व वित्त प्रशिक्षण केंद्र, लेखा कोष भवन, संत गाडगेबाबा विद्यापीठ रोड, जि. अमरावती |
| २८ | नागपूर | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था,जि. नागपूर |
| २९ | वर्धा | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था,जि. वर्धा |
| ३० | चंद्रपूर | सेंट्रल फॉरेस्ट रेंजर कॉलेज, मुल रोड, चंद्रपूर |
| ३१ | भंडारा | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था,जि. भंडारा |
| ३२. | गोंदिया | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था,जि. गोंदिया |
| ३३. | गडचिरोली | जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था,जि. गडचिरोली |